**अतितात्काळ/अर्थसंकल्प प्राथम्य**

**विधानमंडळाच्या जुलै, २०१५ च्या अधिवेशनात सादर केलेले सन २०१५-२०१६ चे खर्चाचे पूरक विवरणपत्र.**

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक :पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३.**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**तारीख : १ ऑगष्ट, २०१५**

**परिपत्रक**

**सन २०१५-२०१६ या वर्षाचे** खर्चाचे पूरक विवरणपत्र **दिनांक १३ जुलै, २०१५ रोजी** विधानमंडळास सादर करण्यात आले. सदर पुरवणी खर्चास आता विधानसभेने मान्यता दिली आहे. **दिनांक ३१ मार्च, २०१६ रोजी** संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली आहे. आणि ते, महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१५ **(सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक- २३ )** म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण,भाग-४ **दिनांक ३० जुलै, २०१५** यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. सदर खर्चाच्या पूरक विवरणपत्रात आकस्मिकता निधीतून घेतलेल्या अग्रिमांच्या भरपाईसाठी समाविष्ट करण्यात आलेल्या पूरक मागण्याच्या संदर्भात, योग्य ती कार्यवाही करण्याची विनंती महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र, मुंबई यांना करण्यात येत आहे. **तसेच, आकस्मिकता निधीतून काढलेला निधी यापुढे आकस्मिकता निधीच्या खर्च खाती न टाकता, एकत्रित निधीच्या खाती खर्ची टाकण्याच्या सूचना सर्व संबंधितांना तात्काळ देण्यात याव्यात.**

३. सर्व मंत्रालयीन विभागांना असेही कळविण्यात येत आहे की, त्यांनी पुरवणी विनियोजन अधिनियमानुसार मंजूर झालेल्या पूरक मागण्यांच्या रकमा वाटप करण्यापूर्वी **योजनांतर्गत मागणी संदर्भात नियोजन व वित्त विभागाची आणि योजनाबाहय साठी वित्त विभागाची मान्यता घ्यावी. मूळ तरतूद अखर्चित असल्यास पुरवणी मागणी वितरीत करण्यासाठी विवक्षीत कारणे असल्याशिवाय सरसकट नियोजन/वित्त विभागाला प्रस्ताव पाठवू नयेत.**

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०११२१२२८७६०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Narayan Bhosale

Digitally signed by Ashok Narayan Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d40850c6db60734c4acd1f5455264095b6839b2fd94fa7c0ad1b12bcab7f8fbb, cn=Ashok Narayan Bhosale
Date: 2015.08.01 12:15:24 +05'30'

**( अ. ना. भोसले )**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,मुंबई.
२) सह/उपसचिव (अर्थसंकल्प शाखा),सर्व मंत्रालयीन विभाग,मुंबई.
३) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा), महाराष्ट्र,मुंबई (अधिनियमांच्या २५ प्रतींसह)
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (व्हीएलसी शाखा),महाराष्ट्र,नागपूर,(अधिनियमांच्या २५ प्रतींसह)
६) महालेखापाल (लेखापरीक्षा),महाराष्ट्र, मुंबई (अधिनियमांच्या १५ प्रतींसह)
७) महालेखापाल (लेखापरीक्षा),महाराष्ट्र,नागपूर (अधिनियमांच्या ५ प्रतींसह)
८) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई (अधिनियमांच्या ४० प्रतींसह)
९) निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई (अधिनियमांच्या ५ प्रतींसह)
१०) सर्व सह/उपसचिव वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
११) कार्यासन अधिकारी,प्रशासन-४, वित्त आयोग,वित्त विभाग,
१२) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई